**माझी कन्या भाग्यश्री या योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पित केलेला निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२४/प्र.क्र.७२/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : -२९ मार्च,२०२५

**वाचा :-** १) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.भाग्यश्री-२०१७/प्र.क्र.१०७/का.६, दि.०१.०८.२०१७.

२) महिला व बाल विकास शासन निर्णय क्र. एबावि-२०२२/प्र.क्र.२५१/का.६, दिनांक ३०.१०.२०२३

३) महिला व बाल विकास शासन निर्णय क्र. एबावि-२०२४/प्र.क्र.७२/का.६, दिनांक २९.०८.२०२४ व दि. १३.०२.२०२५

**शासन निर्णय :-**

माझी कन्या भाग्यश्री (सुधारित) ही योजना अधिक्रमित करून राज्यात दिनांक १ एप्रिल, २०२३ पासून मुलींच्या जन्मानंतर तिच्या सक्षमीकरणासाठी “लेक लाडकी” योजना सुरू करण्यास वाचा क्र. २ येथील दिनांक ३०.१०.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. त्यानुषंगाने माझी कन्या भाग्यश्री योजनेतील दिनांक ३१ मार्च, २०२३ पर्यंतच्या पात्र लाभार्थ्यांना लाभ देण्याकरिता खालील विवरणपत्रातील रकाना क्रमांक-१ मधील प्रधान लेखाशीर्ष/उपशीर्ष/उद्दिष्टामध्ये रकाना क्रमांक-२ येथे नमूद सुधारित अंदाजामध्ये रकाना क्रमांक-४ नुसार पुनर्विनियोजनाने घट करून त्याप्रमाणे रकाना क्र. ५ नुसार पुनर्विनियोजनाने वाढ करून रकाना क्र. ६ मधील पुनर्विनियोजनानंतरच्या तरतुदीमधून रकाना क्र. ७ मध्ये दर्शविल्यानुसार एकुण रुपये १.२१ कोटी (अक्षरी रुपये एक कोटी एकवीस लाख फ़क्त) एवढा निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांना वितरित व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये कोटीत)

| लेखाशीर्ष / उद्दिष्ट | सुधारित अंदाज २०२४-२५ | यापूर्वी वितरीत तरतूद | पुनर्विनियोजनाने घट | पुनर्विनियोजनाने वाढ | पुनर्विनियोजनानंतरची तरतूद | या आदेशान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| लेक लाडकी योजना २२३५ डी ५२४ ३१- सहायक अनुदाने वेतनेतर | ९४.५० | ७०.१५ | (-) १.२१ | ---- | ९३.२९ | ------ |
| माझी कन्या भाग्यश्री **२२३५ बी ९३३** ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२.०० | २२.०० | --- | (+)१.२१ | २३.२१ | १.२१ |
| **एकूण** | **११६.५०** | **९२.१२** | **(-) १.२१** | **(+) १.२१** | **११६.५०** | **१.२१** |

३. माझी कन्या भाग्यश्री (सुधारित ) या योजनेमधील दिनांक ३१ मार्च,२०२३ पर्यंतच्या प्रस्तावांची छाननी योग्यरित्या झाल्याबाबतची खातरजमा आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी करावी. व त्यानुसार विहीत कार्यपध्दतीनुसार सदर निधी संबंधितांना वितरीत करून खर्च करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक १३६/ १४७२, दिनांक २७.०३.२०२५ तसेच वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक १३८/ व्यय-६, दिनांक २९.०३.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२९१८०८२३५४३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2025.03.29 20:59:56 +05'30'

(वि. रा. ठाकूर)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर,
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
३) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई,
४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई,
६) सर्व जिल्हाधिकारी,
७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद),
८) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास ) (जिल्हा परिषद),
९) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प,
१०) वित्त विभाग (व्यय/६ ,अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई,
११) नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय,मुंबई,
१२) कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
त्यांना कळविण्यात येते की, त्यांनी BDS प्रणालीवर निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना वितरीत करावा.
१३) निवड नस्ती -का-६.